मराठी लघुलेखन व मराठी टंकलेखन परीक्षा उत्तीर्ण होण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय, क्रमांक-एसआरव्ही-1099/प्र.क्र.7/99/बारा,
मंत्रालय, मुंबई-400 032. दिनांक 11 जून, 1999.

वाचा :- 1. शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-टंलेप्र-1081/सीआर-344/20ब, दिनांक 6 मे, 1991.
2. शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एसआरव्ही-1093/सीआर-10/93/बारा, दिनांक 3 सप्टेंबर, 1993.
3. शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-आरटीआर-1094/प्र.क्र.8/94/बारा, दिनांक 24 जून, 1997.

* * * * *

**शासन निर्णय**

लिपिक-टंकलेखक, लघुटंकलेखक, लघुलेखक तसेच स्वीय सहाय्यक या संवर्गासाठी सेवाप्रवेश नियम संदर्भाधीन शासन अधिसूचना दिनांक 3 सप्टेंबर, 1993 व 24 जून, 1997 अन्वये निर्गमित करण्यात आले आहेत.

2. या नियमांच्या अंमलबजावणी संदर्भात काही नियुक्ती अधिकारी-यांनी अशी शंका उपस्थित केली की, शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-टंलेप्र-1081/सीआर-344/20-ब, दिनांक 6 मे, 1991 अन्वये विहित करण्यात आलेल्या मराठी टंकलेखन/लघुलेखन आवश्यक असल्यासंबंधीच्या तरतुदी, सुधारित सेवा प्रवेश नियमानुसार लागू होतात किंवा नाही ?

3. या संदर्भात आता असे स्पष्ट करण्यात येते की, वरील अनुक्रमांक 2 व 3 येथे संदर्भित केलेल्या सेवा प्रवेश नियमांच्या अंमलबजावणीप्रयोजनार्थ लिपिक-टंकलेखक, लघुटंकलेखक, लघुलेखक व स्वीय सहाय्यक या पदांवर इंग्रजी टंकलेखन/लघुलेखन अर्हताप्राप्तधारक कर्मचा-यांना 6 मे, 1991 च्या अधिसूचनेमधील तरतुदीनुसार मराठी टंकलेखन/लघुलेखन परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

य.गा.जोशी,
सह सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई,
* प्रोथोनोटरी आणि सिनिअर मास्टर, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
* प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त आणि उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने.

* पत्राने.

एफ-468(5000-6-99)